वन विभाग,मंत्रालय येथील कार्यासनांतील
विषयांचे फेरवाटप.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २०१७/प्र.क्र.३२ /फ-५**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३ मार्च २०१७.

**शासन परिपत्रक -**

वन विभाग,मंत्रालय येथील कार्यासनांची विषयसुची प्रसिद्ध करून बराच कालावधी उलटला आहे. दरम्यानच्या कालावधीत ग्राम विकास व जल संधारण विभागाच्या अधिपत्याखालील सामाजिक वनीकरण विभागाचे वन विभागामध्ये विलीनीकरण करण्यात आले आहे त्यामुळे नवीन दोन कार्यासने निर्माण झाली आहे. तसेच काही विषय नव्याने समाविष्ठ झाले आहेत. यासर्व बाबींमुळे काही कार्यासनांकडील कामामध्ये वाढ झाली असल्याने कामाचा निपटारा विहीत कालावधीमध्ये होण्याच्या दृष्टिकोनातून विषयांचे खालील फेरवाटप करण्यात येत आहे.

| अ.क्र. | विषय | सध्याचे कार्यासन | नवीन कार्यासन |
|---|---|---|---|
| १ | वन विभागातील क्षेत्रीयस्तरावरील गट - ड ते गट - ब मधील कर्मचारी / अधिकारी यांची विभागीय चौकशी प्रकरणे व अपीले आणि त्या अनुषंगाने उद्भवणारी न्यायालयीन प्रकरणे. | फ- ४ | फ- १२ |
| २ | वन विभागातील क्षेत्रीयस्तरावरील गट - अ मधील अधिकारी यांची विभागीय चौकशी प्रकरणे व अपीले आणि त्या अनुषंगाने उद्भवणारी न्यायालयीन प्रकरणे. | फ -८ | फ-१२ |
| ३ | वन विभागातील क्षेत्रीयस्तरावरील गट - ड ते गट - अ संवर्गातील कर्मचारी / अधिकारी यांच्या विभागीय चौकशी प्रकरणी मुदतवाढ मंजूर करणे | फ-४ व फ-८ | फ-१२ |
| ४ | सामाजिक वनीकरण विभागातील प्रधान मुख्य वन संरक्षक, वनसंरक्षक यांच्या आस्थापना विषयक बाबी | फ-१२ | फ-७ |
| ५. | सामाजिक वनीकरण विभागातील उपसंचालक ,सहाय्यक संचालक यांच्या आस्थापना विषयक बाबी | फ-१२ | फ-८ |
| ६. | सामाजिक वनीकरण विभागातील लागवड अधिकारी,रोपवन कोतवाल यांच्या आस्थापना विषयक बाबी | फ-१२ | फ-४ |
| ७. | वन विभागातंर्गत पदांचा आकृतीबंध मंजूर करणे | फ-२ | फ-८ |
| ८. | कार्य आयोजना | फ- २ | फ-६ |

सदरहू आदेशाची तात्काळ अमंलबजावणी करण्यात यावी. तसेच वरील प्रमाणे विषयांचे पुर्नवाटप केल्यानंतर संबंधित कार्यासनांनी त्याच्याकडील दप्तर दाखल तसेच चालू धारिका तात्काळ नवीन कार्यासनाकडे हस्तांतरीत कराव्यात .

सदर परिपत्रक निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१३०७५२१३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.03 13:09:31 +05'30'

**(डी.एल.थोरात)**
सह सचिव (वने)

**प्रत-**

१. मा.मुख्य सचिव,महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. अप्पर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व विभाग)
४. प्रधान सचिव,(महसूल) महसूल व वन विभाग,मंत्रालय ,मुंबई
५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन बल प्रमुख) महाराष्ट्र राज्य नागपूर
६. व्यवस्थापकीय संचालक,महाराष्ट्र वन विकास महामंडळ लि.नागपूर
७. प्रधान मुख्य वनसंरक्षक तथा महासंचालक,सामाजिक वनिकरण , महाराष्ट्र राज्य पुणे
८. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) महाराष्ट्र राज्य नागपूर
९. उप सचिव,(आस्थापना) महसूल व वन विभाग,मंत्रालय ,मुंबई
१०.सदस्य-सचिव महाराष्ट्र जैवविविधता मंडळ, नागपूर
११.सदस्य-सचिव राज्य प्राणी संग्रहालय प्राधिकरण, नागपूर
१२.व्यवस्थापकीय संचालक,निसर्ग पर्यटन विकास ,मंडळ,नागपूर
१३.अप्पर प्रधान मुख्य वनसंरक्षक महाराष्ट्र राज्य (सर्व)
१४.मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव) (सर्व)
१५.वनसंरक्षक (सर्व)
१६.उप वनसंरक्षक (प्रादेशिक / वन्यजीव) (सर्व)
१७.उपसंचालक,सामाजिक वनिकरण (सर्व)
१८. विभागीय /उप विभागीय वन अधिकारी (स्वतंत्र कार्यभार) (सर्व)
१९.महसूल व वन विभागातील सर्व कार्यासने
२०.निवड नस्ती फ- ५